20/10/1118522/001

पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण कर्ज मंजुरी १९९०-९१.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग

शासन निर्णय क्र. पीसीएन १९९०/१७७१/सीआर २३४/९०/नवि-२२,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ५ डिसेंबर, १९९०.

पहा :- संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. १६/३-ब/सी/अर्थसंकल्प ८०७३/दि. १०.१०.९०.

निर्णय :- महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ मधील नियम १२२ उपनियम [१] अन्वये शासनाकडे विहित करण्यात आलेल्या शक्तींचा वापर करुन शासन पिंपरी-चिंचवड नवनगर प्राधिकरणाला रु. ५,००,०००/- [रु. ५.०० लाख फक्त] कर्ज खालील अटींवर मंजूर करीत आहे.

१] व्याजाचा दर : ११ $\frac{१}{२}$ द. वर्षा

२] परत फेडीचा कालावधी : २० वर्षे

३] परतफेडीची पध्दत : अ] कर्ज परत फेडीची सुरुवात कर्ज घेतल्या तारखेपासून पुढे ५ वर्षानंतर, मुद्दल व व्याज समान हप्त्यात.

ब] परतफेडीला सुरुवात होण्याआगोदरची पहिली ५ वर्षे, प्राधिकरणाने रु. ५.०० लाखावर सर्वसाधारण दराने व्याज भरावे व हप्ते वेळेवर न भरल्यामुळे, नगर विकास व आरोग्य विभागाचा ठराव क्र. एसएफ [बीयुडी] ७३-५५४०/युडी-७, दि. १६.११.७६ अन्वये त्यात असलेल्या तरतुदींनुसार दंड भरावा.

४] कर्ज मंजुरीचे प्रयोजन : पिंपरी-चिंचवड भागाचा विकास.

३. पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाने शासनाला त्या विभागाच्या विकासाकरिता तयार केलेले महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ च्या उपकलम २१ अन्वये, नकाशे व प्रस्ताव शासनाच्या मंजुरीकरिता पाठवावेत. तसेच प्राधिकरणाने प्रस्ताव तयार करताना त्यापासून मिळणारे उत्पन्न हे त्या परिस्थितीत इतर प्रस्तावांच्या तुलनेत धरलेले असावे.

४. ही कर्जाची रक्कम [रु. ५ लाख] प्राधिकरणाला एक रक्कमी देण्यात यावी. संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी ही रक्कम [रु. ५ लाख] प्राधिकरणाला त्वरीत मिळेल असे पहावे.

५. तसेच कर्ज रक्कमेचे हप्ते वेळेवर न भरल्यामुळे पहिल्या वर्षी १० टक्के दराने व उर्वरित कालावधीकरिता सर्वसाधारण व्याज दराने दंड वसूल करावा.

६. हा करण्यात आलेला खर्च रु. ५.०० लाख अर्थसंकल्पातील "मागणी क्र. एफ-१५, मुख्य लेखाशीर्ष ६२१७-नगर विकासासाठी कर्जे-६० इतर नगर विकास योजना-१९१ स्थानिक संस्था व महानगरपालिकांना कर्जे राज्य योजनांतर्गत योजना [तीन] प्रादेशिक योजना

कार्यान्वित करण्यासाठी पिंपरी-चिंचवड नगर रचना प्राधिकरणाला कर्ज [६३१७००५३]" याखाली चालू वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागवावा.

६. पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाला देय असलेल्या रु. ५.०० लाखाचे मागणी पत्रक प्रशासकीय अधिकारी नगर रचना व मूल्यनिर्धारण विभाग, पुणे की जो स्वत: आदान व प्रदान अधिकारी आहे. यांनी तयार करून त्यावर संचालक, नगर रचना यांची स्वाक्षरी घेऊन मंजूर करावे. तसेच कर्जाची अदायगी झाल्यानंतर सदर कर्जाचा खर्च मेळ घालून सदर कर्ज परिच्छेद ५ मध्ये नमुद केलेल्या लेखाशिर्षाखालीच खर्ची घातला असल्याचे प्रमाणीत करून या विभागास कळवावे.

७. हा निर्णय शासनाच्या वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक सिआर ६६५/९०/व्यय-३ दिनांक १७.११.९०. अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

घ.नं. तलरेजा

[ घ. नं. तलरेजा ]
महाराष्ट्र शासनाचे उप सचिव.

प्रति,

आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे,
जिल्हाधिकारी, पुणे,
संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे,
सह संचालक, नगर रचना, पुणे,
उप संचालक, नगर रचना, पुणे विभाग, पुणे,
अध्यक्ष, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी-पुणे,
मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी, पुणे,
महालेखाकार, महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखाकार, नागपूर-२, नागपूर,
प्रशासकीय अधिकारी, नगर रचना, वर्ग-२ राजपत्रित पुणे,
संचालक, नगर रचना, पुणे यांचे कार्यालय,
कोषागार अधिकारी, पुणे,
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई [पीआरजी-१०],
नवि-४ कार्यासन, नविवि,
नवि-२२ [निवड नस्तीसाठी],
नवि-३१, कार्यासन अधिकारी, नविवि.